## महाराष्ट्र शासन

**क्रमांक :- संकीर्ण १२२३/ प्र.क्र.१३२/१३स,**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**मंत्रालय, विस्तार इमारत,**
**मादाम कामा मार्ग,**
**हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई- ४०० ०३२.**
**दिनांक :- २८ जून, २०२३.**

<u>**संदर्भ**</u> :- १. श्री.राजेखान कादरखान जमादार यांचे दिनांक २०.०६.२०२३ रोजीचे पत्र.
२. राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण यांचे जा.क्र.रासनिप्रा/ कक्ष-११/ सह. संस्था निव.स्थगिती अभिप्राय / ४८०७/ २०२३, दिनांक २६.०६.२०२३ रोजीचे पत्र.

### आदेश

ज्याअर्थी, राज्यातील सहकारी संस्थांच्या पंचवार्षिक निवडणूकीचा कार्यक्रम राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरणाकडून जाहिर करण्यात आलेला आहे. राज्यात मान्सूनची सुरूवात होत असून ३० जून नंतर मोठ्या प्रमाणात पावसाची सुरूवात होते. त्यामुळे, ज्या सहकारी संस्थांचा निवडणूक कार्यक्रम जाहिर झालेला आहे अशा संस्थांचे निवडणूक कामकाज पुर्णपणे पावसाळ्यात होणार आहे. त्यामुळे, निवडणूक प्रक्रियेमध्ये बाधा निर्माण होवू शकतो. तसेच, या सहकारी संस्थांमधील सभासद शेतकरी खरीप हंगामामध्ये शेतीच्या कामामध्ये व्यस्त असल्याने, ते मतदानापासून वंचित राहू शकतात.

ज्याअर्थी, राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरणाकडून प्राप्त झालेल्या माहितीनुसार राज्यातील निवडणूकीस पात्र असणाऱ्या सहकारी संस्थांची संख्या ८२,६३१ (२५० किंवा त्यापेक्षा कमी सदस्य संख्या असलेल्या सहकारी गृहनिर्माण संस्था वगळून) पैकी ४९,३३३ सहकारी संस्थांच्या प्रारूप मतदार याद्या प्रसिद्ध झालेल्या असून, ४८,६६७ संस्थांच्या अंतिम मतदार याद्या प्रसिद्ध झालेल्या आहेत. अशा संस्थांपैकी ४२,१५७ संस्थांच्या निवडणूक प्रक्रिया पुर्ण झालेल्या असून ६,५१० सहकारी संस्थांच्या निवडणूक प्रक्रिया सुरू आहेत.

त्याअर्थी, राज्यात ३० जून नंतर पर्जन्यमानाचे स्वरूप जास्त असल्याने, उद्भवणारी नैसर्गिक आपत्ती, पावसामुळे जनजीवन व वाहतूक व्यवस्था विस्कळीत होण्याची शक्यता, तसेच, सदर परिस्थिती पूर्वपदावर येण्यास लागणारा कालावधी विचारात घेता, जास्तीत जास्त मतदारांना निवडणूकीमध्ये सहभाग नोंदवता यावा यासाठी, महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० मधील कलम १५७ अन्वये शासनास प्राप्त असलेल्या अधिकारात कलम ७३कक मधील तरतूदीला सुट देवून २५० किंवा त्यापेक्षा कमी सदस्य संख्या असलेल्या सहकारी गृहनिर्माण संस्था तसेच, ज्याप्रकरणी मा.सर्वोच्च / मा.उच्च न्यायालयाने निवडणूक घेण्याचे आदेशीत केले आहे, अशा सहकारी संस्था तसेच, ज्या संस्थांची निवडणूक प्रक्रिया पुर्ण झाली आहे परंतु, अध्यक्ष व उपाध्यक्ष यांची निवड होणे बाकी आहे अशा संस्था वगळून, राज्यातील सर्व सहकारी संस्थांच्या निवडणूका या आदेशाच्या दिनांकापासून ज्या टप्प्यावर असतील त्या टप्प्यावर दिनांक ३० सप्टेंबर,२०२३ पर्यंत पुढे ढकलण्यात येत आहेत.

सदर शासन आदेश महाराष्ट्राच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०६२८१९०६१३३३०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIL JAYRAM CHAUDHRY

Digitally signed by ANIL JAYRAM CHAUDHRY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=f26cf80358fa3133e4d85ddac30ae54b06c63743fd5510dc0ebca082b6c483ce, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D124AE9BBD15BED87DBD08EF779CF1B85A4020339EB1C2EF0E112FB67063011C, cn=ANIL JAYRAM CHAUDHRY
Date: 2023.06.28 19:07:42 +05'30'

**(अनिल ज.चौधरी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. आयुक्त, साखर, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. आयुक्त वस्त्रोद्योग, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. सचिव, राज्य सहकारी निवडणुक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. विभागीय सहनिबंधक/ जिल्हा उपनिबंधक/ उपनिबंधक, सहकारी संस्था (सर्व)
६. निवडनस्ती, कार्यासन १३-स